नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास निधी उपलब्ध करून देणेबाबत. (सन २०१८-१९)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां १०१८/प्र.क्र.७७/नापु-१६ ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख:- २६ नोव्हेंबर, २०१८

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/प्र.क्र.१६२/नापु-१६-ब, दि.२६.०७.१२.
२. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/१०२४/प्र.क्र.२३२/नापु-१६-ब, दि.०२.०१.२०१३.
३. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/प्र.क्र.१६२/नापु-१६-ब, दि.०७.०५.१३.
४. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/१३७८/प्र.क्र.१५४/नापु-१६-ब, दि.०५.०७.१३.
५. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१७/प्र.क्र.१३८३/नापु-१६-ब, दि.२४.०५.२०१७.
६. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१७/प्र.क्र.१३८३/नापु-१६-ब, दि.०४.०७.२०१७.
७. वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-१०१५/ प्र.क्र.१८/ अर्थोपाय, दि.२५.०८.१५.

**प्रस्तावना-**

उक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सन २०११-१२ ते सन २०१५-२०१६ मध्ये प्रशासकिय मान्यता देण्यात आलेल्या काही गोदाम बांधकामास निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रशासकीय मान्यतेसंबंधित संदर्भाधीन शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे गोदाम बांधकामास निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | गोदामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार अंदाजित खर्च (रू.) | यापूर्वी वितरित निधी (.रू) | सदर आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (रू.) |
|---|---|---|---|---|---|
| १) | नागपूर | हिंगणा | १,५७,३०,४०१ | १,४५,२६३ | १,५०,००,००० |
| २) | चंद्रपूर | ब्रह्मपुरी | १,७८,९८,०४७ | १,५७,३४,१३० | २,७०,००० |
| ३) | चंद्रपूर | नागभीड | १,५२,७३,८०० | ६७,८५,९५८ | ७०,००,००० |
| ४) | चंद्रपूर | सिंदेवाही | १,५३,६८,९९३ | ५६,०५,२६६ | ७५,००,००० |
| ५) | पालघर | वसई | १,२४,९१,१३६ | ० | १,२४,९१,१३६ |

| अ.क्र. | जिल्हा | गोदामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार अंदाजित खर्च ( रू.) | यापूर्वी वितरित निधी (.रू) | सदर आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (रू.) |
|---|---|---|---|---|---|
| ६) | रायगड | मुरुड | १,०६,३९,४८८ | ८८,४८,४८८ | १७,९१,००० |
| ७) | सिंधुदूर्ग | कुंभारमाठ | १,२५,३९,४८८ | २६,४१,००० | ९८,९०,००० |
| ८) | अहमदनगर | संगमनेर | ३,५६,२९,७०० | ३,०९,५६,१९६ | १६,००,००० |
| ९) | जळगाव | चाळीसगाव | १,६२,०३,९०१ | १,४८,५१,३७६ | १३,५०,००० |
| **एकूण** | | | | | **५,६८,९२,१३६/-** |
| **अक्षरी रुपये- पाच कोटी अडूसष्ट लाख ब्याण्णव हजार एकशे छत्तीस रुपये फक्त** | | | | | |

२. उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्य्रक्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल)(योजनेंतर्गत) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत व सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन दिलेल्या शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने पूर्ण करण्यात यावी. गोदाम बांधकाम सुरू झाल्यांतर प्रथम बांधकामाचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित बांधकामाचा दरमहा आढावा घेऊन बांधकामाची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

**४. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी. गोदामासाठी निधी प्रत्यक्ष खर्ची होताच संबंधित कामासाठी एकूण वितरीत निधीच्या विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्वरीत शासनास सादर करावे.**

५. बांधकामास विलंब अथवा इतर कारणानी गोदाम बांधकामास वाढीव खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

६. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधीत अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट

असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

७. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरीक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

८. सदरचे आदेश प्राप्त होताच सदरील तरतुद जिल्हाधिकाऱ्यांमार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात यावी. धनादेशाने आहरीत करण्यात येऊ नये.

**९. सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी माहे २८ फेब्रुवारी, २०१९ अखेर खर्ची टाकावा. सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही.**

१०. संदर्भाधीन शासन निर्णय वित्त विभाग दिनांक २५.८.२०१५ मधील मुद्या क्र. (ड) चे तंतोतंत पालन करावे.

११. संबधित गोदाम बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता आदेशानुसारच्या छाननीअंती सुधारित अंदाजित खर्चापेक्षा अधिक निधी वितरित होणार नाही याबाबत संबधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेले अनुदान दि.२८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत खर्च करण्यात यावे. उक्त दिनांकापर्यंत वरील निधी खर्च न झाल्यास अन्य गोदाम बांधकामास वळती करण्यात येईल याची नोंद घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील.

१२. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ च्या भाग-१ उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२७१७१५२७४५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.11.27 17:19:29 +05'30'

**( स.श्री.सुपे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, रायगड, पालघर, सिंधुदूर्ग, जळगाव, अहमदनगर, नागपूर व चंद्रपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, नाशिक, नागपूर
३. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
४. उप आयुक्त (पुरवठा), कोकण, नाशिक, नागपूर
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, रायगड, पालघर, सिंधुदूर्ग, जळगाव, अहमदनगर, नागपूर व चंद्रपूर.
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग जिल्हा- रायगड, पालघर, सिंधुदूर्ग, जळगाव, अहमदनगर, नागपूर व चंद्रपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड, पालघर, सिंधुदूर्ग,जळगाव, अहमदनगर, नागपूर व चंद्रपूर.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय,अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१३. सहाय्यक संचालक (संगणक) लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१४. उपमहाव्यवस्थापक,नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे- ४११००५.
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१६. निवड नस्ती/नापु-१६ब.